उप अधीक्षक भूमि अभिलेख (गट-ब राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने पदस्थापनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : बदली-०७२४/प्र.क्र.२९५/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-** शासन आदेश,क्र. बदली-०७२४/प्र.क्र.२९५/ई-६, दि.३१.०७.२०२४

**शासन आदेश:-**

'महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५' मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने संदर्भाधीन दिनांक ३१.०७.२०२४ च्या शासन आदेशान्वये बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या उप अधीक्षक भूमि अभिलेख (गट-ब राजपत्रित) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेमध्ये प्रशासकीय कारणास्तव अंशत: बदल करुन, रकाना क्र.४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे सुधारित पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | दि.३१.०७.२०२४ च्या आदेशानुसार पदस्थापनेचे पद | सुधारित पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.राहुल तुळशीराम पाटील | उप अधीक्षक भूमि अभिलेख, डहाणू, जि.पालघर | कार्यालय अधीक्षक, जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे. |
| २ | श्री.विजय सुर्यकांत संधानशिव | उप अधीक्षक भूमि अभिलेख, गंगाखेड, जि.परभणी | उप अधीक्षक भूमि अभिलेख, वैजापूर, जि.छत्रपती संभाजीनगर |
| ३ | श्री.सखाराम नरसिंग पवार | उप अधीक्षक भूमि अभिलेख, यवतमाळ, जि.यवतमाळ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, दिग्रस, जि.यवतमाळ |
| ४ | श्री.रामहरी संतोष अलोणे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, दिग्रस, जि.यवतमाळ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, यवतमाळ, जि.यवतमाळ. |
| ५ | श्रीम.स्वप्नजा शेखर मेंडके/ माळवदे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, आटपाडी, जि.सांगली. | उप अधीक्षक भूमि अभिलेख, कवळे महांकाळ, जि.सांगली |
| ६ | श्री.भिमराव मोतीराम नान्रे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, भोकरदन, जि.जालना | उप अधीक्षक भूमि अभिलेख, कळंब, जि.यवतमाळ |
| ७ | श्री.सुशिल रामदास पवार | उप अधीक्षक भूमि अभिलेख, महाड, जि.रायगड | उप अधीक्षक भूमि अभिलेख, इंदापूर, जि.पुणे. |
| ८ | श्रीम.सुवर्णा यशवंतराव मसणे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, कवळे महांकाळ, जि.सांगली | नगर भूमापन अधिकारी, सांगली, जि.सांगली |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | दि.३१.०७.२०२४ च्या आदेशानुसार पदस्थापनेचे पद | सुधारित पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| ९ | श्री.शेखर सुरेश कापसे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, गोंदिया, जि.गोंदिया | उप अधीक्षक भूमि अभिलेख, पवनी, जि.भंडारा. |
| १० | श्री.अविनाश रामदास जगताप | उप अधीक्षक भूमि अभिलेख, शहादा, जि.नंदुरबार | उप अधीक्षक भूमि अभिलेख, देवळा, जि.नाशिक. |
| ११ | श्री.प्रमोद कवडुजी निकुरे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, चंद्रपुर, जि.चंद्रपुर | उप अधीक्षक भूमि अभिलेख, सावली, जि.चंद्रपूर या बदलीपूर्व पदावर १ वर्ष मुदतवाढ |
| १२ | श्री.मिलिंद रामदास राऊत | उप अधीक्षक भूमि अभिलेख, वरोरा, जि.चंद्रपुर | उप अधीक्षक भूमि अभिलेख, चंद्रपूर, जि.चंद्रपूर या बदलीपूर्व पदावर १ वर्ष मुदतवाढ |
| १३ | श्री.सोहनलाल वजीर पालवे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, बाळापूर, जि.अकोला | उप अधीक्षक भूमि अभिलेख, अकोट, जि.अकोला |
| १४ | श्री.राजू श्रावण घेटे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, देवळा, जि.नाशिक. | उप अधीक्षक भूमि अभिलेख, भुसावळ, जि.जळगांव |
| १५ | श्री.सुखदेव तुकारामजी खोंडे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, सिंरोंचा, जि.गडचिरोली | उप अधीक्षक भूमि अभिलेख, सेलू, जि. वर्धा - या बदलीपूर्व पदावर १ वर्ष मुदतवाढ |

२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांनी, वरील अधिकाऱ्यांना नवीन पदस्थापनेच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे.

३. संबंधीत अधिकाऱ्यांस नवीन पदस्थापनेच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन पदस्थापनेच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doe६.rfd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित कळवावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत, असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१४१७२६१३७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAMESH NAMDEO JAGTAP

Digitally signed by RAMESH NAMDEO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0c19f5aff07e8e032316c50df2eee86d4eadc6e4ac1e502c4ce53a7762e7e059, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B42F1BB542CD2BC481C3C6F994B28EBD58BB368E14A9C6CBD23808C8315A965C, cn=RAMESH NAMDEO JAGTAP
Date: 2024.08.14 17:41:53 +05'30'

**( रमेश जगताप )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे.

**प्रत:-**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२) स्वीय सहायक,अप्पर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) सर्व उप संचालक/जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख
४)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) संबंधित अधिकारी-
(द्वारा- जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांच्या मार्फत)
६) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.